पाडाळे लघु पाटबंधारे योजना, तालुका मुरबाड, जिल्हा ठाणे, या योजनेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः लपायो २०१८/(प्र.क्र.२७/२०१८)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १८ ऑगस्ट, २०१८

पहावे :-

१) **कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोपाविम/तां-५/पाडाळे/४३५७/सन-२०१७, दिनांक ३०/१२/२०१७**
२) **वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्यअस-२०१८/प्र.क्र.४३/अर्थसं-२ दिनांक १६/०५/२०१८.**

प्रस्तावना :-

पाडाळे लघु पाटबंधारे योजना, ता. मुरबाड, जि. ठाणे, या योजनेस शासन निर्णय,पाटबंधारे विभाग क्र.लपायो २००१/१८४५/(५९७/२००१)/खारभूमी दिनांक १२/०२/२००३ अन्वये एकूण रु. १३.२१ कोटी किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन १९९९-२००० च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. तसेच या योजनेस शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र.लपायो २००८/८१३/(२८४/२००८)/खारभूमी, दिनांक १९/०१/२०१२ अन्वये एकूण रु. ४३.४७ कोटी किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००७-०८ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

## शासन निर्णय :-

सदरहू शासन निर्णयान्वये पाडाळे लघु पाटबंधारे योजना, ता. मुरबाड, जि. ठाणे, या योजनेच्या एकूण अंदाजित खर्च रुपये ९३.९२ कोटी (रुपये त्र्याण्णव पूर्णांक ब्यांण्णव शतांश कोटी फक्त) या किंमतीस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर कामाकरिता एकूण रूपये ८३.३६ कोटी (रुपये त्र्याऐंशी पूर्णांक छत्तीस शतांश कोटी फक्त ) व अनुषंगिक खर्च रूपये १०.५६कोटी ( रुपये दहा पूर्णांक छप्पन्न शतांश कोटी फक्त ) तरतुदी आहेत. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २०१६-१७ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहे. उपशीर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयीत करण्याच्या विविध टप्प्यांवर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही. सदर सु.प्र.मा. देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर सु.प्र.मा.प्रदान केल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

२) या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही.

३) सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

४) सदर प्रकल्पाच्या द्वितीय सुप्रमामध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

५) संपूर्ण प्रकल्प हा द्वितीय सु.प्र.मा. किंमतीच्या मर्यादेत नियोजन केल्यानुसार सन २०१८-१९ मध्ये पूर्ण करण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६/ २०१८, दिनांक २१/०४/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ९१/व्यय-१२, दि. २३/०४/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने व व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २३ एप्रिल, २०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदरचा प्रस्ताव मान्य करण्यात आला असून व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या प्रसृत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०- सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका (००) (०३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ४९२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली द्वितीय सुधारित प्रशासकिय मान्यता १८७ या अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१८१५३००९७३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2018.08.18 15:37:11 +05'30'

(मि. आ. वाणी)
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
४. सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहाय्यक
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
९. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.

१०. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोकण प्रदेश, मुंबई
११. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. जिल्हाधिकारी, रत्नागिरी
१३. अधीक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी.
१४. अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१६. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

## परिशिष्ट- अ

शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांक : लपायो २०१८/(प्र.क्र.२७/२०१८)/ खारभूमी, दिनांक १८.०८. २०१८ चे परिशिष्ट

पाडाळे लघु पाटबंधारे योजना, तालुका मुरबाड, जिल्हा ठाणे, उपशिर्षनिहाय तरतूदी

**(रूपये लक्ष)**

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर प्रथम सुप्रमानुसार तरतुद | व्दितीय सुप्रमा नुसार तरतुद |
|---|---|---|---|
| **(A) शिर्ष कामे** | | | |
| १ | ए-प्राथमिक | २३.३० | १९.९३ |
| २ | बी-भुसंपादन | ५८४.४३ | ६४९.५४ |
| ३ | सी- कामे | २१२२.७५ | ३३०२.७५ |
| ४ | डी-रेग्युलेटर | १७७.३२ | १३५.७६ |
| ५ | ओ-संकीर्ण | १.५६ | १.५६ |
| ६ | पी-देखभाल दुरूस्ती | ६.८५ | ०.९६ |
| ७ | आर- दळणवळण | १७.०० | २७३.८८ |
| | **एकूण (A)** | **२९३३.२१** | **४३८४.३८** |
| **(B) कालवे व वितरण व्यवस्था** | | | |
| १ | ए-प्राथमिक | १३.१४ | २२.१२ |
| २ | बी-भूसंपादन | ९१.८३ | ६५३.८८ |
| ३ | डी-रेग्युलेटर | २६.७२ | ७७.३६ |
| ४ | इ- फॉल | ८.४१ | २६.०६ |
| ५ | एफ़-आर.एच.टी. | ११४.४२ | ५०१.०१ |
| ६ | जी- पूल | १७.४५ | १७९.९७ |
| ७ | एच- एस्केप | २.८५ | ०.०० |
| ८ | एल-मातीकामे | ४५५.१९ | २१७०.६८ |
| ९ | एम-वृक्षारोपण | ०.९० | ०.९० |
| १० | पी-देखभाल दुरूस्ती | ०.०० | २०.४३ |
| ११ | आर- दळणवळण | ०.०० | २९८.८९ |
| १२ | यू-वितरण व्यवस्था | ४.७४ | ०.०० |
| | **एकुण (B)** | **७३५.६५** | **३९५१.३०** |
| | **एकुण कामे(C = A + B)** | **३६६८.८५** | **८३३५.६७** |
| | **(D) आस्थापना व इतर कामे** | ६७८.५० | १०५६.५५ |
| | **एकुण ( C+ D)** | **४३४७.३६** | **९३९२.२३** |

ठळक बाबी

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र (ICA) ४७४ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा ७.२७७ दलघमी आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. १,१९,५३९/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.२६ > १

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2018.08.18 15:37:46 +05'30'

**(मि. आ. वाणी)**

शासनाचे अवर सचिव